मागासवर्गीय अनुदानित वसतिगृह मान्यता व अनुदान योजना वसतिगृह स्थलांतरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीसीएच -२०१४/प्र.क्र.१४१/शिक्षण -२**
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०००३२.
दिनांक : २१ ऑगस्ट, २०१४.

वाचा -

१) **शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रिडा विभाग क्रमांक: बीसीएच-१०९७/प्र.क्र.१०७/मावक-४, दि.१६.०३.१९९८**
२) **शासन शुध्दीपत्रक : सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, क्रमांक: बीसीएच-२०००/प्र.क्र.२९७/मावक-४, दि.०१.०८.२००८**
३) **आयुक्त समाजकल्याण, पुणे यांचे पत्र क्र.सकआ/शिक्षण/अनुवगृह/स्थलांतर/का-५/२०१४-१५/१९३२, दिनांक ०६.०८.२०१४.**

प्रस्तावना -

स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलामुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देण्याची योजना संदर्भाधीन शासन निर्णय दि.१६.०३.१९९८ अन्वये राबविण्यात येत आहे. सदर योजनेअंतर्गत, कै.रामराव पाटील बहुउद्देशीय शिक्षण प्रसारक मंडळ, गोलेगाव (नवलगाव), ता.भूम, जि.उस्मानाबाद या संस्थेमार्फत मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, बोरगाव खुर्द, ता. बार्शी, जि. सोलापूर या ठिकाणी सुरु आहे. सदर वसतिगृह बोरगाव खुर्द, ता. बार्शी, जि. सोलापूर येथून भूम, ता.भूम, जि.उस्मानाबाद येथे संस्थेच्या सर्व सोयी-सुविधांनी युक्त अशा इमारतीत स्थलांतरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय-

याबाबत सांगोपांग विचार करून स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेअंतर्गत कै.रामराव पाटील बहुउद्देशीय शिक्षण प्रसारक मंडळ, गोलेगाव (नवलगाव), ता.भूम, जि.उस्मानाबाद संचलित मागासवर्गीय मुलांचे वसतीगृह, बोरगाव खुर्द, ता. बार्शी, जि. सोलापूर हे वसतिगृह बोरगाव खुर्द, ता. बार्शी, जि. सोलापूर येथून भूम, ता.भूम, जि.उस्मानाबाद येथे सन २०१४-१५ या शैक्षणिक वर्षापासून स्थलांतरीत करण्यास शासन याद्वारे मंजूरी देत आहे.

२. सदर संस्थेस स्वयंसेवी संस्थामार्फत अनुसूचित जातीच्या मुलांमुलींकरीता चालविण्यात येणाऱ्या अनुदानित वसतिगृहांना मान्यता व अनुदान देणे या योजनेचे अस्तित्वात असलेले नियम व वेळोवेळी अस्तित्वात येणारे नियम बंधनकारक राहतील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२११३२२४७३३२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vasant Gopal Mane

Digitally signed by Vasant Gopal Mane
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Gopal Mane
Date: 2014.09.03 14:56:52 +05'30'

**डॉ.वसंत माने**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग, लातूर/ पुणे
३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर/ उस्मानाबाद
४. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर/ उस्मानाबाद
५. जिल्हा समाजकल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर/ उस्मानाबाद
६. महालेखापाल(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
७. मा.मंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
८. मा.सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
९. सचिव/ अध्यक्ष, कै.रामराव पाटील बहुउद्देशीय शिक्षण प्रसारक मंडळ, गोलेगाव (नवलगाव), ता.भूम, जि.उस्मानाबाद
१०.निवड नस्ती.